# हॅरी हुडीनी

## विश्वातील सर्वात महान जादूगार



# हॅरी हुडीनी

## विश्वातील सर्वात महान जादूगार





हॅरी हुडीनी हा विश्वातील सर्वात महान जादूगार होता. त्याच्या अनेक करामतींनी जादू आणि रहस्य यांच्या इतिहासात नवे विक्रम प्रस्थापित केले.

# HOUDINI

24 मार्च 1874 रोजी हंगेरीत बुडापेस्टमध्ये सॅम्युअल आणि सिसिलिआ वाइस या दांपत्याघरी हॅरी हुडीनी जन्मला. त्याचे नाव एरिक ठेवले. लवकरच हे कुटुंब अमेरिकेच्या विस्कॉन्सिन राज्यातील ॲपल्टनमध्ये गेले. सॅम्युअल शहराचे पहिले ज्यू धर्मीय पाद्री बनले. एरिकचे नाव तेथील उच्चारानुसार एरिच झाले.



तुमचे पती एक चांगले पाद्री आहेत, मिसेस वाइस. पण ते इंग्रजी का शिकत नाहीत?

ते जुन्या विचारांचे आहेत. त्यांना आपल्या भाषेचा अभिमान आहे.

सॅम्युअल कुटुंबाला नव्या देशात तर घेऊन आले. पण त्यांनी कधीच तेथील चालीरीती स्वीकारल्या नाहीत.

एरिच इतर मुलांसारखा नव्हता.



बाळा, तू कधी रडत नाहीस. रात्रभर जागा राहातोस, डोळे मोठ्ठे करून टकमक बघत राहातोस.

काही वर्षांनंतर सॅम्युअलची नोकरी गेली आणि ते सर्व मिलवॉकी शहरात गेले.




पैशाअभावी कुटुंबाचे खाण्यापिण्याचे हाल होऊ लागले. कुमार एरिच आणि त्याचा भाऊ कुटुंबाला शक्य ती मदत करत.



एरिचच्या डोक्यात नवनवे विचार येत असत. वयाच्या नवव्या वर्षी त्याने आपला पहिलावहिला प्रयोग केला.




बाराव्या वर्षी एरिच घरून पळून गेला. त्याला चांगली नोकरी करून कुटुंबाला मदत करायची होती. त्याला कुणाला सुचणार नाही अशी एक भन्नाट कल्पना सुचली.




एरिचची ही नोकरी टिकली नाही. कामासाठी तो शहराशहरात भटकत राहीला.




एरिच आत्ता कुठे असेल, हे वाइस कुटुंबाला कधीच सांगता येत नसे.

प्रिय आई,
मी टेक्सासमधल्या गॅल्व्हस्टन शहरात जातोय. पुढच्या वर्षी घरी परतेन.
शुभेच्छा.
तुझा उनाड मुलगा,
एरिच

To:
Mrs. C. Weiss,
517 6th St.
Milwaukee,
Wisconsin

एरिच नेहमी पत्र लिहीत असे. आपल्या कमाईतून चार पैसे घरी पाठवत असे.

एरिचचे वडील न्यूयॉर्कला गेले. तिथे त्यांनी धार्मिक शिक्षण देणारी शाळा उघडली. थोडे पैसे कमावल्यावर ते कुटुंबियांनाही तिथे बोलावणार होते.

न्यूयॉर्कची ट्रेन हीच आहे का?

हो हीच! बसून घ्या लवकर.

आपले वडील न्यूयॉर्कमध्येच आहेत, हे कळताच एरिच त्यांना भेटायला गेला.




लवकरच पुरेसा पैसा कमावल्यावर त्यांनी आपल्या कुटुंबियांना बोलावून घेतले.

एरिच, माझ्या बाळा!

मम्मा!

पण तिथेही सारे काही सुरळीत नव्हते. पाद्री वाइस यांना कुटुंबियांना पोसण्याइतपत पुरेशी कमाई होत नसे. एरिच आणि त्याचा भाऊ त्यांना शक्य तितकी मदत करत.

ईश्वर आपल्याला नक्कीच मदत करेल.

पाद्री वाइस अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते.

एरिच एका मोठ्या दुकानात निरोप्याचे काम करू लागला. त्याला एक कल्पना सुचली.







सारी नाणी आपल्या कोटांच्या बाह्यांमध्ये, कानाआड तसेच केसांमध्ये लपवून एरिच घरी गेला. त्याच्या आईने दार उघडले तेव्हा......

मला जोरात हलवा. बघा कशी जादू होते!

अरे खरंच की! जादूच झाली म्हणायची!

सुट्टीमध्ये साऱ्यांनी खूप मजा केली.

एकदा धाकट्या भावाने एरिचला नाण्याची साधीसोपी जादू दाखवली.

हे नाणं बघ.

गायब झालं!

यानंतर एरिच जादूसंबंधी मिळेल ते पुस्तक वाचू लागला.

झोप आता. सकाळी लवकर उठायचंय ना!

हो मम्मा, थोडाच वेळ!


एरिचची कोणतीही नोकरी फार काळ टिकत नसे. अनेक तरूण नोकरीची संधी शोधत होते. त्यामुळे नोकरी मिळणे कठीण झाले होते. त्याने कुठेसे वाचले होते, ‘जादूगाराने आधी स्वत:वर विश्वास ठेवला पाहीजे.’ कदाचित त्यालाही अशा विश्वासाची गरज होती.
BOY WANTED


वाट पाहिल्याबद्दल आभार! पण ही जागा आता भरली.
BOY WANTED


एरिचची युक्ती कामी आली. सगळी मुलं निघून गेली.
ही नोकरी मला द्या.
ठीक आहे. दिली तुला ही नोकरी.


आठवड्याअखेरीस एरिच खेळाडुंच्या एका क्लबमधील धावपटुंसोबत धावत असे. त्यामुळे उर्वरित आयुष्यात तो अत्यंत सुदृढ आणि निरोगी राहीला.
व्वा, एरिच! खूप छान!


एरिचचे वडील आणि प्रशिक्षक या दोघांचा दारू आणि तंबाखूला विरोध होता. वहिलांचा धार्मिक कारणामुळे होता तर प्रशिक्षकांचा शरीर व मनाचे नुकसान होत असल्यामुळे होता.


अनेक पुस्तके वाचून एरिच जादू करण्यात कुशल झाला. मग तो आसपासच्या मुलांना जादूचे खेळ दाखवू लागला.


मग एका महान फ्रेंच जादुगाराचे पुस्तक त्याच्या हातात पडले.
मला रॉबर्ट हुडीनसारखे बनता येईल?
MEMOIRS OF ROBERT HOUDIN

एके दिवशी जेवणाच्या सुट्टीत मित्राने त्याला सुचवले.

हुडीनी!

हुडीन नावाच्या शेवटी ‘i’ जोड. बघ, तु सुद्धा हुडीन होशील!

सतराव्या वर्षी एरिच वाइसने आपले नाव ‘हॅरी हुडीनी’ केले. न्यूयॉर्कच्या थिएटरमध्ये एका कार्यक्रमाचा खेळ रद्द झाला तेव्हा हॅरी आणि त्याचा भाऊ थिओ यांना खेळ सादर करण्याची संधी मिळाली.

बघा, याचे हात घट्ट बांधलेयत.

या पेटीला साखळदंडाने कुलूपबंद करू.

आता मी तीन वेळा टाळी वाजवतो. मग बघा, काय चमत्कार होतो ते!

पण काहीच चमत्कार झाला नाही. फार वेळ वाट पाहिल्यावर पडदा टाकण्यात आला आणि पुढच्या कार्यक्रमाच्या खेळासाठी बँड वाजू लागला. हॅरीचा भाऊ अद्याप पेटीतच कैद होता.







यानंतर दोघे 'हुडीनी बंधू' शहर सोडून पश्चिम भागाचा दौरा करायला गेले. त्यांनी आपल्या खेळात काही सुधारणा केल्या.



हुडीनीने आयुष्यात खूप संघर्ष केला. एक दिवस त्याला एक नव्या प्रकारची जादू सुचली.

ती तरूण मुलगी कोण आहे?

ती बेस्सी राहनर आहे.

हुडीनी बेस्सीच्या प्रेमात पडला.

चकीत केलंस तू मला!

चल, गायब होण्याचा खेळ करू आणि लग्न करू.

मग त्यांनी पळून जाऊन लग्न केले. बेस्सीचे कुटुंब कॅथलिक होते तर हॅरी ज्यू धर्मीय होता. दोन्ही कुटुंबांना खुष ठेवण्याकरिता त्यांनी पुन्हा दोन्ही धर्मांच्या पद्धतींनुसार लग्न केले.

मी तीन वेळा लग्न केलंय, पण एकाच व्यक्तिशी!

बेस्सीने भावाची जागा घेतली.

बघा हा चमत्कार!

बेस्सीचे वजन फक्त 94 पौंड होते. हॅरी आणि ती मिळून चांगली जोडी बनली. ते आपल्या जोडीला "हुडीनीज" म्हणवू लागले.

थिएटरमध्ये नियमित काम मिळणे मुश्किलच होते. वसंत ऋतू आल्यावर ते वेल्श बंधुंच्या सर्कशीत सामील झाले.

"हुडीनीज"ची जादूई दुनिया!

पगार कमी पण जेवण छान आहे.

हो, रोजच्या खेळांनी आपलं कौशल्यसुद्धा वाढतंय.


याच काळात हुडीनीला बेड्यांच्या खेळात रस उत्पन्न झाला.
तार वापरून मी बेड्या खोलू शकतो.
हो, पण सराव करत राहा.


पुढील उन्हाळ्यात कॅनडाच्या नोव्हा स्कॉशिया प्रांतात हुडीनीने बेड्यांचा खेळ करू दाखवला.
हुडीनीला बेड्या घालून घोड्याला बांधलंय. तो निसटू शकेल?


दुर्दैवाने घोडा उधळला.
थांब, थांब.


काही मैल जाऊन घोडा थांबला आणि हुडीनीने स्वत:ला मुक्त केले.
माझी सुटका बघायला इथे कुणीच नाही!


1897 साली एका औषध विक्रेत्या सोबत हुडीनीजने पश्चिम भागाचा दौरा केला.


प्रथम हुडीनीज आपल्या खेळाने गर्दी गोळा करत. मग डॉ. हील येऊन या गर्दीला आपली औषधे विकत.


याच काळात काही जादूगार प्रेतात्म्यांशी संवाद साधण्याचे खेळ करू लागले.
हे प्रेतात्म्यांचे खेळ बनावट आहेत. खूप सोप्या युक्त्या वापरतात ते.


पण अशा खेळांना भरपूर गर्दी होई. आपण तिथे जास्त औषधे विकू शकू, असे डॉ. हीलना वाटे.
प्रेतात्म्यांचे खेळ केलेत तर तुम्हाला जास्त पैसे देईन.
हे तर खूपच सोपं आहे.

प्रेतात्म्यांच्या खेळांना खूप यश आले. पण हुडीनीला ते आवडत नसत. तो मनोरंजन करणारा कलाकार होता, लबाड नव्हता. पुढच्या उन्हाळ्यात ते पुन्हा सर्कसमध्ये परतले.




मिनेसोटामध्ये हुडीनीची भेट मार्टीन बेकशी झाली. बेक खेळ आयोजित करत असे.



छान खेळ करता. पण लहान-सहान जादूपेक्षा बेड्यांतून सुटण्याचा खेळ कर.



त्याचवेळी सॅनफ्रान्सिस्कोतील वृत्तपत्रांनी खबर छापली की हुडीनी लोकांची फसवणूक करतो, बेड्या सोडवण्यासाठी तो आपल्या कपड्यांमध्ये चावी लपवतो.



आता आम्ही तुला खुर्चीला बांधून या खोलीत बंद करू.

सॅनफ्रान्सिस्कोच्या दौऱ्यावर असताना हुडीनीने तेथील पोलिसांना आव्हान दिले. हुडीनीकडे चावी नाही याची त्यांनी खात्री केली.

पुढल्या दहाच मिनिटांत हुडीनी स्वत:ला मुक्त करून खोलीच्या बाहेर आला.



ही त्यावेळची एक खळबळजनक बातमी होती. हुडीनीची कमाई खूप वाढली. वृत्तपत्रांनी आपली चूक स्वीकारली.




रातोरात हुडीनी प्रसिद्ध झाला. तो थिएटरच्या प्रत्येक खेळाचा स्टार झाला. देशभरातील पोलीस कोठड्या आणि बेड्यांमधून त्याने स्वत:ला मुक्त करून दाखवले.



या यशाने हरखून हुडीनी 30 मे 1900 रोजी जहाजाने इंग्लंडला निघाला. युरोपमध्ये थिएटरचे खेळ मोठ्या प्रमाणावर चालत. हुडीनी तेथे यशाच्या शिखरावर पोहोचला.



तो प्रथम स्कॉटलंड यार्ड येथे गेला. तेथील पोलीस अधिकाऱ्यांसमोर त्याने आपला खेळ सादर केला.







हुडीनी लोकांना कोणत्याही बेड्या आणायला सांगत असे. सगळ्या बेड्यांमधून तो स्वत:ला सोडवून घेत असे.

हडीनीने संपूर्ण युरोपचा दौरा केला. बर्लिनच्या थिएटरमध्ये सर्वाधिक लोकांनी त्याचा खेळ पाहीला.



प्रत्येक खेळात हुडीनी प्रतिस्पर्ध्याला स्टेजवर बोलवून त्याला बेड्या घालत असे.




कुणीही हुडीनीला मात देऊ शकले नाही.

सोडव मला. मी हार मान्य करतो.

बेड्यांचा बादशाह!

हुडीनी!

हॉलंडमध्ये हुडीनीने स्वत:ला एका पवनचक्कीच्या पंख्याला बांधून घेतले.



पण पवनचक्कीचा पंखा तुटला आणि हुडीनी जमिनीवर येऊन आदळला.




हुडीनी रशियातही गेला. तिथे त्याला राजमहालात ग्रँड ड्यूकसमोर खाजगी खेळ सादर करण्यास सांगण्यात आले.



तो इंग्लंडला परतला. त्याच्या खेळाच्या तिकिटांसाठी लोकांची धक्काबुक्की होई. इतिहासात सर्वात लोकप्रिय कलाकार म्हणून हुडीनीची नोंद झाली.



अखेरीस हुडीनीने अमेरिकेत परतण्याचा निर्णय घेतला.

आपण पाच वर्षे आपल्या देशाबाहेर राहिलो.

हो  ना! बघू या, अमेरिकेत तुझे कसे स्वागत होते!



जबरदस्त खेळ! एकदम हाऊसफुल!




5 जानेवारी 1906 रोजी तो वॉशिंग्टन डी.सी. येथील जेलमध्ये पोहोचला तेव्हा साऱ्या राष्ट्रीय वृत्तपत्रांनी ही बातमी छापली.



तिथे हुडीनीला जवळजवळ निर्वस्त्र करून त्याची तपासणी केली, त्याला साखळदंडाने जखडले. मग त्याला एका कोठडीत डांबले. तिथे अध्यक्ष गारफिल्डच्या खुन्यालाही डांबले होते.

दोनच मिनिटांमध्ये हुडीनी निसटून कोठडीबाहेर आला. मग त्याने एक वेगळीच जादू दाखवली.

काय करतोयस तू?





27 मिनिटांत त्याने सर्व खुन्यांच्या कुलूपबंद कोठड्या उघडल्या आणि त्यांची कवायत काढली.

अशा वेगवेगळ्या धाडसी प्रयोगांमुळे हुडीनी यशाचे मनोरे चढत गेला.




काही ठिकाणी त्याने हजारो लोकांसमोर बेड्या बांधून पुलावरून नदीत उडी घेतली.






एका कठीण खेळामध्ये तर हुडीनीने पाण्याने काठोकाठ भरलेल्या कुलूपबंद पेटीतून स्वत:ला सहीसलामत बाहेर काढले.




हुडीनीएवढा वेळ कुणीच आपला श्वास रोखू शकत नव्हते.


हुडीनी जगभर फिरला. 1910 साली ऑस्ट्रेलिया खंडावर विमान उडवणारा तो पहिली व्यक्ती ठरला.
वर्षभर आधीच तो विमान उडवायला शिकला होता. पण ऑस्ट्रेलियानंतर त्याने कधीही विमान उडवले नाही.


जिथेजिथे तो जाई तिथेतिथे तो महान जादुगारांच्या थडग्यांना जरूर भेट देई.
त्याचं कुटुंब गरीब आहे. मी त्यांच्यासाठी पैसा उभा करेन.
HERE ALSO RESTS THE ABOVE
JOHN ANDERSON
WIZARD OF THE NORTH
AGED 60







हुडीनीने या सिनेमाचा खूप प्रचार केला. त्यासाठी तो एका क्रेनला लटकला आणि मग युक्ती करून तिथून निसटला.

हुडीनी काहीही करू शकतो!

त्याच्यात काही दैवी शक्ती आहे का?

1924 साली हुडीनीने दैवी शक्ती असणाऱ्या गुरुंच्या विरोधात मोहीम सुरू केली. त्याने संपूर्ण अमेरिकेचा दौरा करून प्रेतात्म्यांशी संवाद साधणाऱ्या लोकांचे बिंग फोडले.







न्यूयॉर्कच्या सर्कशीत हुडीनीने केलेला जादूचा खेळ पाहून सगळे अचंबित झाले.

बघा, आता मी हा पडदा बंद करतो.




बेड्यांमधून सहज सुटणारा हा जादुगार मृत्युच्या पाशातून मात्र सुटला नाही. 1926 साली हेलोवीनच्या दिवशी अपेंडीक्स फुटल्यामुळे त्याचे दु:खद निधन झाले.




साऱ्या जगाने या महान जादुगाराच्या मृत्यूवर शोक व्यक्त केला. आपल्या जादुने त्याने लोकांचे भरपूर मनोरंजन केले. आज त्याच्या मृत्यूनंतरही त्याच्या जादूची लोकप्रियता कमी न होता उलट वाढतच चालली आहे.

The END